पोषण अभियानांतर्गत अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका, अंगणवाडी मदतनिस यांना साडी उपलब्ध करुन देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एबावि-२०२०/प्र.क्र.२८८/का.६**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : - २४ डिसेंबर, २०२१

**संदर्भ** :- १) केंद्र शासन, महिला व बाल विकास विभाग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.NNM/७/२०१७-WBP, दिनांक ४.९.२०२०.
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एबाविसेयो/पोषण अभियान/का.४/२०२०-२१/५२३९, दिनांक १०.१२.२०२१.
३) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र.डिसिटी २३१६/प्र.क्र.१३३/का.१४१७, दिनांक ५.१२.२०१६.
४) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२०२१/प्र.क्र.१४१ /का.६, दिनांक ०२.०९.२०२१ व दिनांक १६.११.२०२१.

**प्रस्तावना:-**

पोषण अभियान या केंद्र पुरस्कृत पोषण अभियानांतर्गत राज्यातील अंगणवाडी केंद्रांमधील अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना प्रत्येकी २ संच हातमाग साड्या उपलब्ध करुन देण्यासंदर्भात केंद्र शासनाने संदर्भाधीन क्रमांक-१ येथील पत्रान्वये सूचित करुन त्याकरिता आवश्यक निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. त्यानुषंगाने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी संदर्भाधीन क्रमांक-२ येथील पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या निर्देशानुसार पोषण अभियानांतर्गत अंगणवाडी कर्मचाऱ्यांना साडया घेण्याकरिता संदर्भाधीन क्रमांक-३ येथील शासन निर्णयामधील तरतुदीनुसार प्रति साडी रु.४००/- प्रमाणे २ साड्यांकरिता रु.८००/- एवढी रक्कम प्रत्येक अंगणवाडी कर्मचा-यांच्या बँक खात्यामध्ये थेट लाभार्थी हस्तांतरित (DBT) करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाच्या निर्देशानुसार पोषण अभियानांतर्गत अंगणवाडी सेविका, मिनी अंगणवाडी सेविका व मदतनीस यांना प्रत्येकी २ नग हातमाग साडया घेण्याकरिता प्रति साडी रु.४००/- प्रमाणे एकुण रु.८००/- एवढी रक्कम संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार प्रत्येक अंगणवाडी कर्मचा-यांच्या बँक खात्यामध्ये थेट लाभार्थी हस्तांतरित (DBT) करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. त्यानुषंगाने याप्रकरणी केंद्र शासनाचे संदर्भाधीन क्र. १ येथील पत्र तसेच संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयामधील तरतुदींचे पालन करण्याबाबत आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांनी दक्षता घ्यावी.

३. प्रस्तुत प्रकरणी येणारा खर्च हा २२३६-पोषण आहार, ०२-पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १०१-विशेष पोषण आहार कार्यक्रम, (११) राष्ट्रीय पोषण अभियान, (११)(०१) पोषण अभियान(केंद्र हिस्सा ८० टक्के) (कार्यक्रम) २२३६२०८४, ५०-इतर खर्च या लेखाशीर्षाखाली संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२२२१८२८५७२२३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2021.12.24 17:41:34 +05'30'

(महेश वरूडकर)

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
२) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, रायगड भवन, नवी मुंबई.
३) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी (जिल्हा परिषद)
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
६) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
७) सर्व जिल्हा कार्यक्रम अधिकारी (महिला व बाल विकास ) (जिल्हा परिषद)
८) सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी ( ग्रामीण/नागरी/आदिवासी) प्रकल्प
९) निवड नस्ती -का-६.